**महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयीन**
**महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयीन वापराकरिता झेरॉक्स मशिन खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हज-२०२१/प्र.क्र.१९७/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- २१ मार्च, २०२२

**संदर्भ:-** (१) समक्रमांकाचे दि. १७.१२.२०२१ चे ज्ञापन
(२) महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयाचे पत्र, क्रमांक :-प्र.क्र.९/२०२२/ एमएसएचसी/२०, दिनांक २०.०१.२०२२

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयीन कामकाजासाठी संदर्भ क्र. १, दिनांक १७.१२.२०२१ च्या आदेशान्वये एक झेरॉक्स मशिन खरेदी करण्यास रु. १,१०,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, अपेक्षित मानकांचे झेरॉक्स मशीन महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयाने संदर्भ क्र. २, च्या पत्रान्वये जेम्स पोर्टलवर अपेक्षित मानकांचे मशीन अशा किमतीमध्ये उपलब्ध नसल्याचे कळविले आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र. १ च्या ज्ञापनातील निर्णयाचा फेरविचार करण्यात आला.

**शासन निर्णय:-**

संदर्भ क्र. १ येथील ज्ञापन याद्वारे रद्द करण्यात येत आहे. महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयीन कामकाजासाठी एक झेरॉक्स मशिन खरेदी करण्यास अंदाजित रक्कम रु. २.८० लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटी/शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर खरेदी, उद्योग, उर्जा व कामगार विभागाने शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि.२४.०८.२०१७ अन्वये व वेळोवेळी केलेल्या सुधारित कार्यपद्धतीनुसार व सदर शासन निर्णयातील अटी/शर्तीच्या अधिन राहून करण्यात यावी.

२. या कारणास्तव होणारा खर्च मागणी क्र. झेड ई-१, ए, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च २२३५ ए २६७, योजनेतर दत्तमत, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टाखाली टाकण्यात येईल.

३. वित्त विभागाकडून सदर प्रयोजनार्थ निधी उपलब्ध झाल्यानंतरच प्रत्यक्ष खरेदी करण्यात यावी.

४. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आला आहे, त्याच प्रयोजनासाठी व मंजूर निधीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांची राहील.

५. महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयात नादुरुस्त असलेले झेरॉक्स मशिन विहित शासकीय कार्यपध्दतीनुसार निर्लेखित करण्यात येवून त्याबाबत शासनास कळविण्यात यावे.

२. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-५ मधील अ.क्र.१० (अ) नियम क्र.१३४ मधील १ या अटींच्या अनुषंगाने तसेच, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२११५४८०५८११४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.03.21 15:51:54 +05'30'

**( दि. मा. सोनवणे )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर, महाराष्ट्र राज्य.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अवर सचिव (व्यय-१/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अवर सचिव (का-५/का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, रुम.क्र.६ व ७, तळमजला, साबू सिद्दिकी,मुसाफिरखाना, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
६. निवडनस्ती (का-५).